राज्य शासनाच्या १५० दिवसांच्या कृति
आराखड्याबाबत-ई-गव्हर्नन्स सुधारणा.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-१७२५/प्र.क्र.१२६/मातं**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दि.१२ जून, २०२५**

**संदर्भ** : शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-१७२५/प्र.क्र.१२६/मातं, दि.३० मे २०२५

**प्रस्तावना :**

मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी १५० दिवसांचा कृती आराखडा या विषयावर दि.७/५/२०२५ रोजी बैठक घेऊन शासकीय कार्यालयांमध्ये ई-प्रशासन सुधारणा आणण्याबाबत निर्देश दिले होते. त्यानुसार राज्य शासनाच्या प्रशासनिक विभागासाठी १५० दिवसांचा कृती आराखडयात ई गव्हर्नन्स सुधारणा करण्याबाबतचे शासन परिपत्रक दि.३०/५/२०२५ रोजी निर्गमित करण्यात आले आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ हा ई-प्रशासन सुधारणांबाबत राज्यस्तरावर स्पर्धा आयोजित करणेसंदर्भातील आहे. त्यानुसार स्पर्धा आयोजित करण्यात येणार असल्याने कामाचे मूल्यमापन करण्यासाठी राज्यस्तरीय समिती गठीत करणे तथा प्राप्त माहितीचे मूल्यमापन करुन राज्य समितीला मूल्यमापन अहवाल सादर करणेसाठी प्रशासकीय समिती गठीत करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

ई-प्रशासन सुधारणांच्या अनुषंगाने राज्य स्तरावर, विभाग, जिल्हा व तालुका स्तरावर स्पर्धा आयोजित करण्यात येणार आहे. ई-प्रशासन कार्यक्रमाचे मुल्यांकन खालील टप्प्यात करण्यात येणार आहे.

अ) अंतरीम अहवाल :- दि.१ ऑगस्ट २०२५

ब) अंतिम अहवाल :- दि.२ ऑक्टोबर २०२५

क) स्पर्धेचा निकाल :- दि.२५ ऑक्टोबर २०२५

असा कालावधी उपरोक्त संदर्भात नमूद शासन परिपत्रक दि.३० मे, २०२५ अन्वये ठरवून देण्यात आला आहे. सदर कृती आराखड्याची अंमलबजावणी बरोबरच स्पर्धेच्या अंमलबजावणीसाठी माहिती तंत्रज्ञान विभाग हा मुख्य समन्वयक विभाग म्हणून काम पहाणार असून स्पर्धेसाठी सर्व विभाग प्रमुख माहितीचे संकलन, त्याचे विश्लेषण करणे अपेक्षित आहे. यापूर्वीच राज्यात १०० दिवसाचा कृती आराखडा कार्यक्रम राबविण्यात आला आहे. तद्नंतर आता नव्याने १५० दिवसांचा ई-गव्हर्नन्स सुधारणा कृती आराखडा राबवायचा असल्यामुळे तथा ई-गव्हर्नन्स कृती आराखडयाच्या अनुषंगाने स्पर्धा आयोजित

करण्यात येणार असल्याने कामाचे मूल्यमापन करण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे.-

| | | |
|---|---|---|
| १ | मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (महसूल) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव (नगर विकास-१) | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव (ग्रामविकास) | सदस्य |
| ७ | संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय | सदस्य सचिव |

ई-गव्हर्नन्स कृती आराखडयाच्या अनुषंगाने स्पर्धा आयोजित करण्यात येणार असल्याने सर्व प्रशासकीय विभागांनी केलेल्या कामाची / ई-गव्हर्नन्स सुधारणांची माहिती संकलीत करुन माहितीचे मूल्यमापन करुन ती राज्यस्तरीय समितीला सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे प्रशासकीय समिती गठीत करण्यात येत आहे.-

| | | |
|---|---|---|
| १ | संचालक,माहिती तंत्रज्ञान संचालनालय | अध्यक्ष |
| २ | सह-मुख्य कार्यकारी अधिकारी, मित्रा | सदस्य |
| ३ | श्रीमती शिवाली पांडे, प्रकल्प व्यवस्थापक,मॅकन्झी | मॅकन्झी कंपनीचे प्रतिनिधी |
| ४ | श्रीमती सेजल लुंबा, असोसिएट मॅकन्झी | मॅकन्झी कंपनीचे प्रतिनिधी |
| ५ | कक्ष अधिकारी (तांत्रिक) | सदस्य सचिव |

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०६१२१८१३५७८३०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARRAG JAIIN NAINUTIA

Digitally signed by PARRAG JAIIN NAINUTIA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=ca5d2cef094adb5e2c21a7b30120daf2298bc38b570bce0790299cb4308a3f25, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FAAD89321F712F3B550E952380F8161D3819403554AC22C5BE2DB1F446F1B154, cn=PARRAG JAIIN NAINUTIA
Date: 2025.06.12 18:14:51 +05'30'

**(पराग जैन नैनुटिया)**
**प्रधान सचिव**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
४) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५) मा. उप मुख्यमंत्री, नगरविकास, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. उप मुख्यमंत्री, वित्त व नियोजन, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.
९) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१३) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५) सर्व विभागीय आयुक्त.
१६) सर्व पोलीस आयुक्त (पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, वगळून).
१७) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरिक्षक
१८) सर्व जिल्हाधिकारी
१९) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळून)
२०) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
२१) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२२) सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये (महसूल विभाग स्तर संबंधित विभागीय आयुक्त यांच्यामार्फत)
२३) सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये (जिल्हा स्तर संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)
२४) सह-मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिट्यूट फॉर ट्रान्सफॉर्मेशन (मित्रा).
२५) प्रतिनिधी मॅकन्झी कंपनी
२६) निवडनस्ती (कार्या-मातं)